तुरुंगवासियांची परी

# एलिझाबेथ फाइ



खूप पूर्वी इंग्लंडमधे न्यूगेट तुरुंग नावाची एक भयानक जागा होती. कायदेभंग करणार्या लोकांना या तुरुंगात पाठविण्यात येत असे. न्यूगेट तुरूंगात कैद्यासाठी अंथरूण पांघरूण नव्हते. कैदी आजारी पडले तर औषध-पाणी मिळत नव्हते. त्यांची सतत उपासमार होत होती.



लोकांना न्यूगेट मधील कैद्याबद्दल सहानूभूती नव्हती. काही लोक तर असही म्हणत होते की, "चांगलं जेवण आणि चांगले कपडे वापरण्याचा त्यांना अधिकारच नाही."

पण काही लोकांना त्यांची दया आली. विशेष करून मुलांना त्यांच्या आयांबरोबर तुरूंगात रहावे लागत होते त्या मुलाकरीता त्यांना वाईट वाटत होते. पण ज्या लोकांना सहानुभूती वाटत होती त्यांनी काहीच केले नाही. त्यांनी फक्त नापसंती व्यक्त केली. बरेच लोक म्हणाले की, "आम्हाला कळत नाही आहे कि आम्ही काय करायला पाहिजे."



शेवटी एका महिलेने मनावर घेऊन काही ठोस काम केले. तिचे नाव होते,"एलिझाबेथ फ्राइ"! एलिझाबेथ फ्राइने तुरूंगातील भयानक परीस्थितीबद्दल ऐकले. तीला खूप वाईट वाटले आणि रागही आला. तिला वाटलं की परमेश्वरालाच तिने  कैदी लोकांची मदत करावी असे वाटते आहे. तीला माहित होते की नुसत्या गप्पा मारून अडचणी सोडविण्यासाठी मदत मिळणार नाही. मग तिने एक ठोस योजना बनविली. दुसर्या दिवशी एलिझाबेथने आपल्या एका मित्राला योजना सांगितली. "मला माहित आहे, न्यूगेट तुरूंगातील महिलांना कशी मदत करता येईल," ती म्हणाली. "मी महिला कैद्यांना भेटीन.
मी त्याच्यासाठी कपडे, जेवण, पांघरूण, आणि औषध घेऊन जाईन.
मी बायबलही घेऊन जाईन. व देव तुमचेयावर किती प्रेम करतो ते सांगिन. कशी वाटते माझी योजना? एलिझाबेथने आपलेया मित्राला विचारले. ( एलिझाबेथ फ्राइ क्वेकर पंथाची होती)  तिने मित्राला विचारले, "माझ्याबरोबर तुरूंगात येशिल?
"मला अस वाटत आहे की तुझ डोक ठिकाणावर नाही," मित्र म्हणाला. "त्या बायका म्हणजे जनावर आहेत. तू तिथे गेलीस तर त्या तुझ्या झिंजा उपटतील, डोळेयात बोट खुपसतील."
"मला नाही वाटत की असे काही होईल. मी त्यांना सांगेन की मी त्यांची मैत्रिण आहे" एलिझाबेथने शांतपणे म्हणाली. "मी त्यांना विचारीन की मी त्याची कश्याप्रकारे मदत करू शकते. मी तर उद्या तिथे जाणार आहे. तू ये नाहीतर नको येऊस.....तुझी मर्जी!"



दुसर्या दिवशी एलिझाबेथ फ्राइ गाडीत बसून न्यूगेट तुरूंगाच्या दिशेने निघाली. कैद्यांसाठी व त्यांच्या मुलांसाठी दोन मोठ्या टोपल्या भरून सामान तिने बरोबर घेतले होते. तुरूंगापाशी पोहोचल्यावर महिला विभागापर्यंत ती चालत गेली आणि तिने दरवाजा ठोठावला.



"आपण कोण अहात? तुम्हाला काय हव आहे?" रक्षकाने विचारले.
(इंग्गंडमधे रक्षकाला ' टर्नकी' म्हणतात कारण तो किल्ली फिरवितो)
"मी एलिझाबेथ फ्राइ आहे," एलिझाबेथ म्हणाली.
"मी महिला कैद्यांना आणि त्याच्या मुलांना भेटायला आले आहे. मी त्यांच्यासाठी , मुलांसाठी कपडे आणले आहेत आणि बरोबर जेवण औषध आणि पांघरूण आणली आहेत."
"तुम्ही तुरूंगात जाऊ शकणार नाही," रक्षक म्हणाला.
"ते नियमाविरुध्द आहे. त्याला तसेच कारणही आहे. तुरूंगात जाणार्या बाहेरच्या लोकांना भयंकर प्रसंगांना तोंड द्यावे लागले आहे. मी तुम्हाला आत जाऊ देणार नाही. तुम्ही जे सामान बरोबर आणले आहे ते मला द्या, मी ते कैद्यामधे वाटेन."
"मी असे मुळीच करणार नाही," एलिझाबेथने निश्चयाने सांगितले. "मी कैद्यांना भेटायला आले आहे. मी त्यांना भेटेनच. तुम्हाला चांगले वाटू दे किंवा ना वाटू दे. कृपा करून मला आत जाऊ द्या."



रक्षकाने  भुवया उंचावून एलिझाबेथकडे आश्चर्याने पाहिले. चांगला पहेराव केलेली प्रतिष्ठित महिला तुरूंगाच्या आसपास फिरकत नसत. ही एक विलक्षण बाई आहे जिला तुरूंगात प्रवेश हवा आहे.

"बरं, ठीक आहे," शेवटी रक्षक म्हणाला. "मी तुम्हाला आत जाऊ देतो पण मी तुमच्याबरोबर येणार नाही. मी कधीच एकटा आत जात नाही. कमीत कमी दोन रक्षकांना बरोबर घेऊन जातो. आत जातांना संरक्षणार्थ एक लांब काठीपण जवळ ठेवतो. तुम्हाला काही वाईट अनुभव आला तर तक्रार करू नका."

नंतर रक्षकाने एका मोठ्या चावीने लोखंडाचा भक्कम दरवाजा उघडला. एलिझाबेथ दरवाजातून आत गेली. रक्षकाने दरवाजा लावून पुन्हा कुलूप ठोकले.





"अग, इकडे बघा," एक बाई जोराने ओरडली.  "बघा, एक प्रतिष्ठित महिला आपल्याला भेटायला आली आहे. हा हा हा...."
तेव्हढ्यात दोन कैदी महिलांनी एलिझाबेथच्या हातातील टोपल्या हिसकावून घ्यायचा प्रयत्न केला. "ए बये, तू इथे काय करते आहेस?" एका बाईने रागाने विचारले, "आम्हाला तुमच्यासारखे लोक आवडत नाहीत."
आता काय करावं हे एलिझाबेथला सुचेना. या बायका अंगावर धावून आल्या तर.?..अशी तिला थोडी भीती वाटली.

आत गेल्यावर एलिझाबेथच्या लक्षांत आलं की ती एका सुनसान आणि दुर्गंधीयुक्त खोलीमधे उभी आहे. तिला सगळ्या बाजूने मोठ्ठा आरडाओरडा  ऐकू आला. तिथे आजारी बायका रडत ओरडत होत्या. भुकेलेली मुलं जोरात आक्रोश करीत होती. एका कोपर्यात काही बायका भाकरीच्या लहानशा तुकड्यासाठी आणि फाटक्यातुटक्या कपड्यासाठी भांडत होत्या.
"ते माझ्या मुलाचं पांघरूण आहे," एक बाई म्हणाली. "ते तू मला परत दे."
"ओढून तर बघ, तुझे डोळेच बाहेर काढी," ...दुसरी बाई किंचाळली.



अचानक तिला एका लहान मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. मुलाच्या अंगावर एकसुध्दा कपडा नव्हता. आणि ते थंडीने कुडकुडत होता. एलिझाबेथला त्या मुलाची इतकी दया आली की तिची सगळी भीती पळून गेली.

एलिझाबेथने टोपल्या खाली ठेवल्या आणि ती त्या मुलाजवळ गेली. तीने मुलाला उचलून घेतले व प्रेमाने थोपटले. नंतर आपल्या टोपलीतून एक सदरा आणि पँट काढून त्या मुलाला घातली. मुलाचे रडणे लगेच बंद झाले. तुरूंगाच्या त्या खोली एकदम शांत झाली. आता पुढे काय?.... सगळे कैदी वाट पहात होते.

"सख्यांनो," एलिझाबेथने बोलायला सुरवात केली. "मी एलिझाबेथ फ्राइ! मला तुमच्याशी मैत्री करायची आहे. मी ऐकले आहे की तुम्ही इथे फार कठिण जीवन जगता अहात. मी तुमची मदत करायची इच्छा आहे. मी ऐकले आहे की इथे मुलांना साधे कपडेही मिळत नाहीत. म्हणून त्यांच्यासाठी मी काही कपडे घेऊन आले आहे. मी ऐकले आहे की इथे पोटभर खायला मिळत नाही. म्हणून मी जेवणाचे पदार्थही आणले आहेत. अजून तुम्हाला काय हवे आहे. मी तुमच्यासाठी अजून काय करू शकते?”

एलिझाबेथचे बोलणे ऐकून सगळ्या बायका सुन्न झाल्या. आजवर त्यांना कुणीच विचारले नव्हते की त्यांना काय पाहिजे आहे.



शेवटी एक तरूण मुलगी पुढे आली. “आम्हाला खायला हवे आहे," ती म्हणाली. “आणि आम्हाला कपडे पण हवे आहेत. पण आम्हाला सगळ्यात जास्त जरूर आहे.....आम्हाला हाताला काही काम हवे आहे. आम्ही इतक्या कंटाळून गेलो आहोत... मग दिवसभर एकमेकीबरोबर भांडत बसतो नाहीतर आरडाओरडा करीत रहातो."

एका महिलेने आपल्या लहान मुलीला पुढे आणले. "ही मुलगी फक्त ७ वर्षाची आहे. तीला माझ्या बरोबर या घाणेरड्या ठिकाणी रहावे लागत आहे कारण तिची काळजी घेणारे कुणी नाही. मला भीती वाटते की ती माझ्यासारखी वाईट मार्गाला लागेल. तीला वाचतातरी यायला हवे. पण इथे पुस्तकेच नाहीत. तुम्ही काही पुस्तके आणू शकाल का?”

"हो," एलिझाबेथ फ्राइ म्हणाली. "माझ्या लक्षात येत आहे तुमच्या आणि तुमच्या मुलांच्या खूप गरजा आहेत. आपण एकत्र बसून त्यावर विचार करू या."



एलिझाबेथ आणि कैदी महिलानी पूर्ण दुपारभर चर्चा केली आणि एक योजना बनविली. शेवटी एलिझाबेथ म्हणाली, "आता मला जायला हवे. पण जाण्या आधी मी बाइबलमधील काही भाग मी वाचून दाखविते.

"ईश्वर आमचा आसरा आहे, व तोच आमची शक्ती आहे." एलिझाबेथ वाचत होती..., "संकटाच्यावेळी ईश्वर नेहमी मदत करायला तयार असतो."





सर्व महिला कृतज्ञतेने भारावून गेल्या होत्या. याअगोदर त्यांना कुणीही बायबल वाचून दाखविले नव्हते. आता देव संकटकाळी मदत करतो हे त्या प्रत्यक्ष अनुभवत होत्या. देवानेच एलिझाबेथला त्यांच्याकडे पाठविले तर नव्हते ना...?



घरी परत आल्यावर एलिझाबेथ तिच्या सर्व मित्रांकडे गेली, तिथे आपण काय करायला पाहिजे, हे सांगतांना ती म्हणाली, "तुरूंगाची साफसफाई करयला आपल्याला त्या महिलांना मदत करावी लागेल. तिथे खूपच घाण आहे. मुलांसाठी आपल्याला शाळा सुरू करावी लागेल. तेथील महिलांना शिवणकाम शिकवावे लागेल. आपल्याला खूप वस्तुंची आवश्यकता आहे. झाडू, पोतेरी, बाटल्या, पुस्तके, पेन्सिल, कपडे, सुई- दोरा इ. तुम्ही यातील काही वस्तु घेऊन मला न्यूगेट तुरूंगात भेटू शकाल का?

एलिझाबेथचे मित्र तिला मदत ररण्यासाठी तयार झाले.

दुसर्या दिवशी सकाळी जेव्हा एलिझाबेथ व तिचे मित्र तुरुंगात भेटले तेव्हा रक्षकाने काही बाचाबाची न करता त्यांना आत सोडले. "देव तुमचे भले करो," असेही तो त्यांना म्हणाला.



"नमस्कार"! ही आमची मैत्रिण आहे, एलिझाबेथ फ्राइ. ती आमच्यासाठी परी आहे."

महिला कैद्यांनी रडत विचारलं, "तू काय आणलं आहेस? आणि तुझ्याबरोबर आलेल्या या बायका कोण आहेत?"

"या बायका मदत करायला आल्या आहेत," एलिझाबेथ म्हणाली. "त्या माझ्या मैत्रिणी आहेत. आम्ही साफसफाई करण्यासाठी सामान घेऊन आलो आहोत. तुमच्या मुलासाठी शाळा सुरू करण्यासाठी पुस्तकही आणली आहेत. पण त्यांना शिकविण्यासाठी शिक्षिकेची आवश्यकता आहे. तुमच्यापैकी कुणाला लिहिता वाचता येत का?"

"मला येतं,"...एक तरूण मुलगी म्हणाली. "मी शाळेत शिक्षिका होईन. कदाचित असे केल्याने मला मी केलेल्या वाईट कामाचं प्राय:श्चित्त करता येईल."

"ठीक आहे," एलिझाबेथ म्हणाली. "मग आपण आजपासूनच शाळा सुरू करू या"



सर्वांनी मदत केली. काही महिला साबण आणि पाण्याने साफसफाई करायला गेल्या. काही शाळेसाठी टेबल- खुर्च्या, पुस्तकांसाठी कपाट याची व्यवस्था केली.

मुलही आपली कामे करण्यात व्यस्त झाली. आता तुरूंगाच्या भिंती, जमिनी इतक्या वाईट दिसत नव्हत्या.

"हे पहा, आपल्या जवळ सुई- दोरा आणि कापड सूध्दा आहे. तुम्ही शिवणकाम करायला शिकू शकता. तुमचे कपडे तुम्ही स्वत: शिवू शकता. मी तुम्ही बनविलेल्या वस्तु विकायला मदत करेन. मग तुमच्याजवळ आवश्यक गोष्टी विकत घेण्यासाठी पैसेही असतील."
हे सर्व पाहून महिलांना उत्साह आला. तुरूंगातून बाहेर पडल्यावरही त्या आपली उपजीविका करू शकतात, त्यांना परत कधीच चोरी करावी लागणार नाही.



एलिझाबेथ फ्राइ आणि तिच्या मैत्रिणी रोज तुरूंगात जाऊन कैदी महिलाबरोबर बराच वेळ घालवू लागल्या. कैदी महिलांनी सुंदर गोधड्या, लहान मुलांचे कपडे तसेच झगे बनवायले. एलिझाबेथने या वस्तु विकून त्याचे पैसे महिलांना दिले.

दर दिवशी एलिझाबेथ त्याना बायबल मधील काही भाग वाचून दाखवित असे. कैद्यांना पण बायबल ऐकण आवडत होतं. त्यांना जाणवलं की देव खरच त्यांच्यावर किती प्रेम करतो. त्यांनी देवाने सांगितलेला मार्गावरून जाऊन जीवन कसे जगायचे याचा धडाही दिला.

एलिझाबेथ फ्राइ जे करत होती त्याची वार्ता पर्या इंग्लंडमधे पसरली. आता समाजातील मान्यवर व्यक्ती एलिझाबेथच्या यशाचे गमक तिला विचारू लागले. या लोकंना पण कैद्यांची मदत करायची होती.

एलिझाबेथ फ्राइ म्हणाली, "रहस्य नाही... हे अगदी सरळ आहे. मी कैद्यांना सांगत असते की देव तुमच्यावर प्रेम करतो. त्यांना काय हवे आहे हे मी त्यांना विचारते."



एलिझाबेथ कुरनई फ्राइ (१७९० - १८४५) एक अत्यंत धार्मिक आणि दृढनिश्चयी महिला होती. तिच्या काळांत ती समाजसुधाकर होती. आजच्या काळातही ती प्रभावशाली समाजसुधारक ठरली असती. तिने पूर्ण इंग्लंडमधले तुरूंग सुधारण्यासाठी कायदे लागू केले. तिने संसदेत जावून व्यक्तिगत पातळीवर साक्षी दिल्या. व तुरूंग सुधारणा कायदा मंजूर करून घेतला. आणि तो लागू होण्यासाठी भरपूर मेहेनत घेतली.

पूर्ण वेळ तुरूंग सुधारणेच्या कामात व्यग्र असूनही एलिझाबेथ फ्राइने कैदी आणि त्यांच्या अडचणीकडे कधीच दुर्लक्ष केले नाही. ती त्यांना भेटायला जात असे. त्यांच्या जेवण, इतर आवश्यक वस्तु पुरवित असे. त्यांचे नैतिक व आध्यात्मिक मनोबल वाढविण्याचा प्रयत्न करीत असे. तुरूंगातून सुटका झाल्यावरही कैद्यांनी चांगल्या जीवनाला सुरवात करावी म्हणून ती त्यांना सतत भेटत राही. फाशीची शिक्षा झालेल्या कैद्याबरोबर ती शिक्षेच्या आदल्या रात्री रहात असे.

एलिझाबेथ फ्राइला मुख्यत: तुरूंग सुधारणा कायद्यासाठी ओळखल जात असले तरी तिच जीवन इतर अनेक गोष्टीमुळे परीपूर्ण झाले होते. ती "क्वेकर" पंथिय म्हणून वाढली. पण तिच्या परिवारातील अन्य सदस्यांना ते मान्य नव्हते. केवळ सतराव्या वर्षी तिने धर्मांतरण केले व आपले जीवन केवळ लोकांसाठी काम करण्यात घालवीन अशी शपत घेतली.

तिला वडिलांकडून मिळालेल्या संपत्तीमधून तिने गावतील गरीब मुलासाठी शाळा सुरू केली. शेजारी कुणी आजारी असेल तर त्यांची सेवा करीत असे. गरीब लोकांचा आधार होऊन ती राहिली. जोसेफ फ्राइने लग्नाचा प्रस्ताव तिच्यासमोर ठेवला तेव्हा प्रथम तिने नकारच दिला. कारण तीचा जन्मच समाजसेवेसाठी झाला आहे अशी तीची निष्ठा होती. पण जोसेफने वचन दिले की तिच्या कार्यात तो हस्तक्षेप करणार नाही. नंतरच्या वर्षात तुरूंग सुधारणेच्या कामामधे त्याने खूप मदत केली.

एलिझाबेथ आणि जोसेफची १२ मुल होती. पण आपल्या एव्हढा मोठा परिवार असूनही एलिझाबेथ फ्राइने आपला वेळ, पैसे आणि उर्जा समाजासाठी खर्च करण्यात कमी केले नाही. इतर कामाबरोबर तिने दोन शाळा सुरू केल्या. आजारी लोकांची सेवा केली. क्वेकर चर्चच्या मंत्रीपदावर ती होती. आणि फाशीची शिक्षा रद्द करण्यासाठी तिने सतत प्रयत्न केले. आणि त्याबरोबर इंग्लंडमधे गोरगरीबांसाठी सार्वजनिक शाळा सुरू केल्या.

एलिझाबेथ फ्राइने येशुच्या शिकवणीप्रमाणे जीवनभर काम करीत राहीली. तिने भुकेल्यांना जेवू घातलं, आजारी व कैद्यांना आधार दिला.

**समाप्त**